**महत्तमीकरण आणि गणनसामर्थ्य**
वसंत पळशीकर

मोठ्या संख्यांमधला हिशेब करता न येणे, वजन, मापे नीट वाचता न येणे, हिशेब ठेवता न येणे यामुळे, थोडक्यात, गणन-सामर्थ्याचा अभाव असल्यामुळे शोषणास अनुकूल परिस्थिती निर्माण होते; इतकेच नाही तर, अशी व्यक्ती कित्येकदा स्वतःचा लाभही पुरेपूर करून घेऊ शकत नाही, स्वतःच स्वतःच्य नुकसानीस कारणीभूत ठरते, या प्रा. स. ह. देशपांडे यांच्या म्हणण्याशी कोणी दुमत होण्याचे कारण नाही.* बुद्धीला शिस्त लावण्याच्या दृष्टीने, रेखीव विचार करावयास शिकविण्याच्या दृष्टीने, अमूर्त गोष्टींविषयीचे चलनवलन मनात निर्माण करण्याच्या दृष्टीने गणनसामर्थ्याचे महत्त्व इतके निर्विवाद नसले तरी हा त्यांचा मुद्दाही मान्य केला जाईल. वर्तमानकाळात आणि येणाऱ्या काळातही प्रत्येकाला गणनसामर्थ्याची गरज पडणार आहे आणि त्यासाठी सर्वांचेच योग्य शिक्षण व्हायला पाहिजे, याविषयी देखील कोणी वाद घालणार नाही.
“अनेक अविकसित देशांमधून गणनहीनता फार मोठ्या प्रमाणावर अस्तित्वात असली पाहिजे, आणि तिचे त्या त्या अर्थव्यवस्थांवर दुष्परिणाम होत असले पाहिजेत, तरीही त्या विषयाकडे सैद्धांतिक अर्थशास्त्रज्ञांचे पुरेसे लक्ष गेले नाही," असे लिहितात. ते इतके चटकन मान्य होण्यासारखे नाही. आर्थिक विकासाचे अर्थशास्त्र सांगणाऱ्यांनी साक्षरता, शिक्षण यांचे महत्त्व प्रतिपादलेले आढळते. साक्षरतेमध्ये, शिक्षणामध्ये गणनसामर्थ्य उत्पन्न करण्याची गोष्ट ते गृहीत धरतात, असे म्हणणे योग्य होईल.
विकसित असो वा अविकसित असो, सर्वच समाजांमध्ये आज विषमता आणि शोषण यांचा आढळ होतो. सर्वच समजांमध्ये तीच एक कारणे त्या पाठीशी आहेत असे नाही. मुद्दा असा की, विषमता आणि शोषण यांना मध्यवर्ती लक्ष्य करून, आर्थिक व्यवहारांचेच केवळ नव्हे तर अर्थशास्त्रीय सिद्धांतनाचे, अर्थ- शास्त्रीय गृहीतांचे विश्लेषण करण्याची गोष्ट शिष्टमान्य प्रतिष्ठित अर्थशास्त्रीय वर्तुळात बसत नाही. स्पर्धायुक्त बाजारपेठ संरचनेत पूर्ण ज्ञान गृहीत का धरलेले असते हा खरा प्रश्न आहे. कारण, व्यवहारात अनेकांपाशी असे पूर्ण ज्ञान नसते, ही वस्तुस्थिती अर्थशास्त्रज्ञालाही दिसू शकणारी असते. पूर्ण ज्ञान गृहीत धरले की मग घडणाऱ्या व्यवहारात काही गैर नाही असे आपोआपच सिद्ध होते. पूर्ण ज्ञान नसते ही वस्तुस्थिती मान्य केली की मग त्याचे परिणाम काय, पूर्ण ज्ञान का नाही, पूर्ण ज्ञान होण्याच्या आड कोणी येत आहे काय, असे अवघड व गैरसोयीचे प्रश्न उपस्थित होऊ लागतात. मग त्या त्या अर्थशास्त्राची आणि अर्थव्यवस्थेची नैतिक ( वा अनैतिक ) बैठक स्पष्ट होऊ लागते.
प्रचलित प्रतिष्ठित अर्थशास्त्र हे ' शास्त्र ' ( Science ) नाही, ती एक आयडियालॉजी आहे, येथपर्यंत आपण अपरिहार्यपणे येऊन पोचतो.
प्रा. देशपांडे यांनी आपल्या लेखात आदिवासींची परिस्थिती, त्यांचे वागणे, विचार करणे आधाराला घेतले आहे. भारतातील बिगर आदिवासी समाजातही अगदी तळच्या गटांमध्ये आदिवासी- सदृश अनेक आचारविचार दृष्टोत्पत्तीस येतात हे त्यांनी निदर्शनाला आणले आहे. या संदर्भात एकदोन मुद्दे उपस्थित करता येईल.
आदिवासी आपल्या एका वेगळ्या, वैशिष्ट्यपूर्ण सांस्कृतिक व ऐहिक विश्वात राहात असतो. त्याच्या ऐहिक जीवनाच्या संदर्भात त्याला ज्या विशिष्ट पातळीचे गणनसामर्थ्य आवश्यक असते ते त्याच्यापाशी असते. आदिवासी समाजातही काहींच्या पाशी या बाबतीत उपजत हुशारी असेल व अशा व्यक्तींना त्यामुळे काही लाभ अधिक मिळत असतील हे शक्य आहे. काही आदिवासी समाजांमध्ये गणनसामर्थ्य हे एक तज्ज्ञ कौशल्य म्हणून अस्तित्वात असण्याची, त्यातून निर्माण होणाऱ्या ज्ञानाच्या क्षेत्रातील मक्तेदारीची शक्यता नाही. वाल्यांच्या ठिकाणी गणनसामर्थ्य नाही असे आपण म्हणतो तेव्हा एका वेगळ्या सांस्कृतिक व ऐहिक विश्वाच्या कसोटीवर तसे म्हणत असतो. प्रा. देशपांडे यांनाही हे अमान्य होणार नाही. पण याचा अर्थ ते पुरेसा स्पष्ट करीत नाहीत. 'एका गणनहीन संस्कृतीचा दुसऱ्या गणनसमर्थ संस्कृतीशी ... संपर्क आलेला असेल तेव्हा' (जाड ठसा माझा ) असे ते लिहितात. हा नुसता संपर्काचा प्रश्न नाही. संपर्काच्या पलीकडे जाऊन एका संस्कृतीचे दुसऱ्या संस्कृतीवर अतिक्रमण होते, त्यातून जित-जेते, स्वामी - मांडलिक असे संबंध प्रस्थापित होतात तेव्हा शोषणात्मक संबंध प्रस्थापित होतात. गणनहीनता स्वतःहून शोषणाला कारणीभूत ठरण्याचे कारण नाही. तिला अवास्तव महत्त्व देणेही गैर ठरेल. गणनसामर्थ्य संस्कृतीचे प्रभुत्व गणनहीन संस्कृतीवर प्रस्थापित होते, आणि ऐहिक व्यवहारामध्ये गणनसामर्थ्याची गरज असते, तेव्हा गणनहीनता हे शोषणाचे आणखी एक कारण ठरते. साधन उपयोजन सुयुक्त न होणे, किंवा महत्तमीकरण साध्य न होणे यांच्याही बाबत हीच गोष्ट खरी आहे. आज आम्ही

आदिवासींना बिगर आदिवासी सांस्कृतिक व ऐहिक विश्वात राहण्याखेरीज दुसरा पर्याय मोकळा ठेवलेला नाही आणि वरचढ असलेल्या सांस्कृतिक व्यूहाची मूल्ये, तत्त्वे आमच्या व्यूहाच्या वरचढपणामुळे तेही स्वीकारत आहेत. एकदा हे घडून आले की मग गणनहीनता त्याला अधिकच पंगू, दुबळी बनविते यात शंका नाही. आदिवासी - सदृश आचार-विचार आढळणाऱ्या समाजसोपान परंपरेतील तळच्या गटांबाबतही हे खरे आहे. मुद्दा असा की, या सगळ्यांमागे 'प्रगत' संस्कृतीने ' अप्रगत संस्कृतीला जिंकून घेतल्याची, शोषण तिच्यावर लादल्याची पायाभूत वास्तवता असते आणि ही वास्तवता अंतिमतः कशातून प्रकट होत असते? तर उत्पादन - साधनांच्या मालकीतून, राजकीय सत्तेच्या मक्तेदारीतून. गोष्टी निकरालाच आल्या तर महत्त्व कशाला असेल, गणनसामर्थ्याला की जेतेपणाला, हा प्रश्न विचारल्यास उत्तर स्पष्ट मिळते.
हाच मुद्दा असाही मांडता येईल. गणनसामर्थ्यात तुलनेने कमी असलेल्या संस्कृतीने अधिक गणनसामर्थ्य संस्कृतीला जिंकून घेतल्याची उदाहरणे इतिहासात आढळतात. आर्यांनी जेव्हा भारतातील मोहंजदडो-हडाप्पा नागर संस्कृतीला आपल्या अंकित बनवले तेव्हा बहुधा असेच घडले असेल; किंवा आजही अने वेळा मालकापेक्षा मुनीम / कारकुनाचे गणनसामर्थ्य अधिक आढळते. महत्त्व आर्थिक व राजकीय सत्तेला सर्वप्रथम असते. गणनसमर्थ माणसे भाडोत्री ठेवली जाऊ शकतात.
प्रा. देशपांडे यांनाही हा मुद्दा अमान्य होईल असे नाही. त्यांनी तो स्पष्टपणे मांडलेला नाही; पण तो मांडणे आवश्यक होते. एरवी गणनसामर्थ्यावर दिला जाणारा भर हा मुख्य समस्येला बगल देणारा ठरू शकतो.
आदिवासींच्या व्यवहारांसंबंधीची त्यांनी दिलेली काही उदाहरणे वेगळ्या दृष्टिकोनातून विचारात घेणे आवश्यक आहे असे मला वाटते. प्रचलित प्रतिष्ठित अर्थशास्त्र वा सांस्कृतिक मूल्ये यांची चौकट गृहीत धरणे कितपत बरोबर असाच विचार आपणास पडावयास पाहिजे. आदिवासी कमी शहाणा ( wise ) की आपण, असे आपण स्वतःला विचारले पाहिजे.
श्री. यशवंत भांदिगरे या स्वयंसेवकाने एका आदिवासीस गवतविक्रीच्या व्यवहारात कसा निव्वळ तोटा झाला ते दाखवून दिल्याचे उदाहरण त्यांनी दिले आहे. आदिवासीचा बेहिशोबीपणा. वा अडाणीपणा यातून सिद्ध होतो असे म्हणण्याआधी कितीतरी अधिक माहिती आपणास विचारात घेतली पाहिजे. गवताखेरीज अन्य कोणत्या मालाचे उत्पादन त्याला करता येणे शक्य होते का, त्यासाठी ज्ञान, कौशल्य, भांडवल या अर्थाने लागणारी कुवत त्याच्यापाशी होती का, त्या मालाला जवळच खात्रीची बाजारपेठ मिळाली असती काय, इत्यादी प्रश्न विचारात घ्यावे लागतील. गवतकापणीसाठी त्याने उचलून पैसे दिले का, बैल- गाडीचे भाडे पैशात दिले का, या प्रकारचे प्रश्नही विचारले पाहिजेत. गवतकापणीपासून पुढच्या प्रत्येक क्रियेस नगद पैसे त्याने दिले असतील, आणि ते किती द्यावे लागणार आहेत हे त्याला आधीच माहीत असेल, गवताचे पैसे किती मिळतील हही त्याला आधी माहीत असेल, आणि केवळ सगळ्या खर्चाची एकत्र मांडणी करून बेरीज करण्याइतकी आकडेमोड त्याला येत नव्हती म्हणून व्यवहार आतबट्ट्याचा झाला असेल तरच गणनसामर्थ्याशी त्याला झालेला निव्वळ तोटा जोडता येतो. या सगळ्यांचा खुलासा जवळ असल्याखेरीज हे उदाहरण आपणास निर्विवादपणे काहीच सांगत नाही. त्याच्या परिस्थितीत आदिवासीच कदाचित अधिक शहाणा असेही ठरू शकेल. ( तसे या बाबतीत होतेच असे मी म्हणत नाही.)
अंड्याचे पैसा दोन पैसे देऊन अंडे न नेता नंतर चांगले मोठे झालेले कोंबडे नेणाऱ्या सावकाराची गोष्ट विचारात घ्या. प्रचलित अर्थशास्त्रीय दृष्टिकोनातून पाहिल्यास सावकाराने महत्तमीकरण साधले, तर आदिवासीला कोंबड्याचे पुष्कळ जास्त पैसे आले असते पण त्याच्या अडाणीपणामुळे ते गमावले. दोघांचे सांस्कृतिक व्यूह वेगळे होते हे विसरल्याने आपला घोटाळा होतो. अंड्याच्या किमतीत कोंबडे मिळविण्यासाठी आपण आदिवासीच्या वेगळ्या समजुतीचा फायदा उपटतोय याची सावकाराला जाणीव होती. फायदा घेता येत असला तर तो असा घ्यावा ही गोष्टही त्याच्या सांस्कृतिक व्यूहात बसत होती. आदिवासी हा केवळ दुबळाच नाही, तर तो एक प्रकारे अर्ध- मानव, रानटीच प्राणी; तेव्हा त्याच्याशी कसेही वागायला हरकत नाही ही समजूत आजही आहे तर त्या काळी ती कितीतरी अधिक असणार.
प्रस्तुत व्यवहार उभयतांच्या राजीखुशीने झाला असेल तर प्रचलित अर्थशास्त्र काय म्हणणार? की सावकाराने महत्तमी - करण साधले. आदिवासीचे काय? ज्या अर्थी आदिवासीने राजीखुशीने व्यवहार केला तेव्हा त्यानेही महत्तमीकरण साधले असणार. असो. तरी अर्थशास्त्रज्ञ दावा करणार किंवा साधले नसल्यास त्याला तोच जबाबदार असे म्हणून मोकळा होणार. आदिवासीचे बघणे कसे? एकदा एक वस्तू अमक्याची आहे म्हटल्यावर, त्या अंड्यातून आलेले कोंबडही त्याचेच. आदिवासी काही उचलून वेगळे, पदरचा पैसा खर्च करून त्या कोंबड्याला घालत नव्हता. त्याचे ते कोंबडे मिळवून खाते आणि देणारा आपण नसून देणारा देव, तो

जसा मला देतो तसा त्यालाही देतो, ही त्याची वृत्ती असणार. सावकाराचा लोभीपणा, फसविण्याची तयारी, आपले त्याचे असा सतत हिशेब मांडून साधनसंपत्तीकडे पाहण्याची वृत्ती हे सर्व एका बाजूला. दुसऱ्या बाजूला आदिवासीची नैसर्गिक साधनसंपत्तीकडे पाहण्याची वृत्ती, त्याचा सरळपणा, त्याची सचोटी शहाणा कोण? सांस्कृतिक व्यूह त्याचा अधिक चांगला की आपला?

याला आणखीही एक पदर आहे. समजा ते कोंबडे मेले. आपल्याच सांस्कृतिक व्यूहातील व्यक्ती असती तर ती सरळपणे असे सांगू शकेल की, ' ते अंडे तुझे म्हणून कोंबडेही तुझे हे बरोबर आहे; पण ते कोंबडे मेले. ' आदिवासींमध्ये या प्रकारचे व्यवहार होत होते का, व अशा वेळी काय घडत होते ते आपणास माहिती करून घ्यावे लागेल. पण अशी शक्यता मान्य करता येईल असे व्यवहार नेहमी होत असले तर काही रूढ रीत असणार. असो. पण सावकाराला आपण हे उत्तर देऊ शकत नाही, त्याला एक ना एक कोंबडे दिलेच पाहिजे हे त्याला अनुभवाने ठाऊक असणार. म्हणजे परत आपण जगाच्या जित - जेते संबंधाच्या पायाभूतपणाशी येऊन ठेपतो.

प्रा. देशपांडे यांनी महत्तमीकरणाच्या संदर्भात गणन- सामर्थ्याचा मुद्दा उपस्थित केला आहे. त्या त्या काळात ज्या ऐहिक व्यवहारांमध्ये माणसाला सहभागी व्हावे लागते ते ते ऐहिक व्यवहार नीट व समजून करता येण्यासाठी आवश्यक ते गणनसामर्थ्य दरेकाच्या ठिकाणी उत्पन्न करण्याची गरज निर्विवाद आहे. पण मला मुद्दा उपस्थित करायचा आहे तो महत्तमीकरणाबद्दल.

आदिवासींच्या संदर्भातल्या उदाहरणावरून बोध घेऊन विचारावयाचे तर पुढील प्रश्न मी उपस्थित करीन :-

(१) महत्तमीकरणाचे अर्थशास्त्रीय गृहीत मांडण्यात सोय व फायदा कोणाचा होता व आजही आहे?

(२) (लाभाची व्याख्या सर्वव्यापी - (all inclusive) केली तर मग जे जे घडते ते ते प्रत्येकाचेच महत्तम लाभ साधून देणारे असते असे आपोआपच उरते. लाभाची व्याख्या काटेकोरपणे व सीमित स्वरूपात करणे एकंदर अर्थशास्त्रीय कलाला धरून ठरेल. अशी काटेकोर व सीमित व्याख्या गृहीत धरून प्रश्न असा की, ) महत्तमीकरणास महत्त्व देणे, महत्तमीकरणाची इच्छा दरेकाने उपभोक्त्याचा उत्पादक म्हणून बाळगावी हे कोणत्या प्रकारच्या व्यवहारांच्या संदर्भात नीतीला धरून होते आणि कोणत्या प्रकारच्या व्यवहारांच्या संदर्भात अनीतीला पोषक ठरते? यालाच जोडून पुढचा प्रश्न असा की, मग दोन्ही प्रकारच्या व्यवहारांच्या संदर्भात एकच संज्ञा वापरणे योग्य आहे का?

(३) "स्वतःला पैशाच्या रूपातील नफा अधिकात अधिक मिळेल अशा रीतीने आपल्या साधनसामग्रीचा वापर" म्हणजे महत्तमीकरण असेल तर अशा महत्तमीकरणाच्या इच्छेला ज्या सांस्कृतिक व्यूहात पायाभूत स्थान असेल त्या सांस्कृतिक व्यूहाची गुणवत्ता आपण काय मानणे योग्य होईल? असा सांस्कृतिक व्यूह आपण जवळ करावा काय? महत्तमीकरण हे एक प्रधान गृहीत, मूल्य व ध्येय मानणाऱ्या अर्थशास्त्राविषयी आपली भूमिका काय असावी?

या भूमिकेवर इतरांना आणण्याचा प्रयत्न करण्यातून समाजात शोषणाची बैठक अधिक भक्कम आणि सन्मान्य आणि सुप्रतिष्ठित होणार नाही काय? (आणि हे सर्व महत्तमीकरण नामक एक तथाकथित शास्त्रीय तत्त्वाचा बुरखा घेऊन?)

या प्रश्नांच्या संदर्भातही प्रा. देशपांडे यांची अमुक एक भूमिका आहे असे मला म्हणावयाचे नाही. हे प्रश्न त्यांनी विचारात घेणे आवश्यक आहे असे मात्र मला वाटते.

* स. ह. देशपाडे : महत्तमीकरण आणि गणनसामर्थ्य. ( अर्थसंवाद, एप्रिल - जून, १९७८ )